# अरविंद गुप्तांची गोष्ट



**लेखक :** समीर शिपूरकर

**वैज्ञानिक खेळण्यांचे संशोधक म्हणून अरविंद गुप्तांचा आपल्याला परिचय आहे. सहज उपलब्ध असलेल्या आणि टाकाऊ वस्तूंपासून ते ही खेळणी तयार करतात. अनेक पुस्तके लिहिलेले आणि अनेक पुरस्कार मिळालेले अरविंद गुप्ता यांच्या शिरपेचात 'पद्मश्री' पुरस्काराने मानाचा तुरा खोचला आहे. त्यांची ओळख करून देणारा हा विशेष लेख –**

खगोलशास्त्रावर संशोधन करणारी पुण्यातली आयुका नावाची जी संस्था आहे तिथंच मुक्तांगण विज्ञान केंद्र आहे. गेली अनेक वर्षं अरविंद गुप्ता आणि त्यांचे सहकारी तिथं काम करतायत.

अरविंद गुप्ता हे स्वत:ला विज्ञान प्रसारक म्हणवून घेतात. तितकं त्यांना पुरेसं वाटतं. पण ह्या एका शीर्षकामागं कोणता माणूस दडलाय हे समजून घेणं आवश्यक ठरतं.

मंडळी घाबरू नका. ही त्यांची चरित्रगाथा नाहीये. ह्या माणसाला समजावून घेताना तारांबळ होऊ नये म्हणून ही गोष्ट सांगतोय.

मुक्तांगण केंद्रामधली ही खोली म्हणजे ऊर्जाकेंद्र आहे. खोलीत गेल्यानंतर नजर एका ठिकाणी ठरत नाही. सगळया भिंतींवर रंगीबेरंगी खेळणी, विज्ञानाचे प्रयोग, भिरभिरे, कारंजी, पंप, कागदांच्या असंख्य वस्तू, टूथपेस्ट आणि बाटल्यांची टोपणं, पाण्याच्या बाटल्या, लोहचुंबक, तारांची भेंडोळी, ओरिगामीचे कागद, काडयांपासून केलेल्या भूमितीय आकृत्या, अशा अनेक गोष्टी. हया सगळया टाकाऊ गोष्टींमधनं तयार होतात अद्भुत खेळणी जी विज्ञानाची तत्त्व तर समजावून सांगतातच, पण त्या आधी आपल्या चेहेऱ्यावर हसू उमटवतात. आश्चर्यानं आपण भारावून जातो.

अरविंदजींना विज्ञानाचा जादूगार म्हटलं जातं. पण आपण इथं थांबायला नको. जादूगार थक्क करतो आणि निघून जातो. अरविंदजी त्याच्या पुढची जबाबदारी घेतात, गूढ उकलून दाखवण्याची. पाबळचा विज्ञान आश्रम जसं डीमिस्टिफिकेशनचं काम करतो तसंच अरविंदजीसुध्दा वस्तू खोलून मोडून तोडून पुन्हा नव्यानं बनवतात. ‘द बेस्ट थिंग अ चाईल्ड कॅन डू टू अ टॉय इज टू ब्रेक इट. मुलांनी केलेला एखाद्या






खेळण्याचा सर्वात उत्तम उपयोग म्हणजे त्यांनी ते मोडणं' –असं ते मानतात.

ह्या केंद्रानं विज्ञान खेळणी कशी बनवावीत हे सांगणाऱ्या एकेक मिनिटाच्या फिल्म्स बनवल्या आहेत. तब्बल ७५० फिल्म्स आणि त्यांचं रूपांतर १८ भाषांमधे. कोणत्या भाषा? हिंदी, मराठी, गुजराती, मल्याळम, कन्नड, उडिया, पंजाबी, तमीळ, बंगाली, ही यादी इथंच थांबत नाही. चायनीज, कोरियन, जापनीज, उझ्बेक, ताजिक, फ्रेंच, रशियन, कोरियन, स्पॅनिश... अजून किती हव्यात. एक मात्र आहे, ही बहुतेक सगळी भाषांतरं त्या त्या भाषेतल्या लोकांनी उत्स्फूर्तपणे, आपणहून केलेली आहेत. कोणताही करार न करता, पैशांची कोणतीही देवाणघेवाण न होता ही कामं निव्वळ एकमेकांना जोडून घेण्याच्या इच्छेतून तयार झालेली आहेत.

अरविंदजी झपाटून अनुवाद करत असतात. जगभरातली चांगली पुस्तकं ते एकहाती भाषांतरित करतात. अनुवादाचा बॅक टू बॅक नॉनस्टॉप धमाका इथं सुरू असतो. जगभरात चांगलं काही निर्माण झालं की त्याचा अनुवाद मराठीत आणि हिंदीत होतो. चांगला मराठी लेख दिसला की तो इंग्रजीत भाषांतरित होतो. चित्ररूपी पुस्तकांवर त्यांचं भारी प्रेम आहे. त्यांना अनेक मित्र भेटलेत जे स्वत: चित्रं काढतात आणि अरविंदजी लिखाण करतात. आणि हां हां म्हणता नवं पुस्तक समोर येतं. अरविंदजींनी स्वत: भरपूर लिखाण केलं आहे. दुर्मीळ पुस्तकं त्यांनी स्वत: टाईप करून लोकांना वाचायला उपलब्ध करून दिली आहेत. दूरदर्शनवर त्यांचे विज्ञान खेळण्यांचे असंख्य कार्यक्रम झाले आहेत. अजून एक गोष्ट, त्यांच्या ऑफिसमधला स्कॅनर सतत चालू असतो. भारतातली आणि जगभरातली उत्तमोत्तम पुस्तकं पूर्ण स्कॅन करून सगळयांना मोफत वाचता येतील आणि डाऊनलोड करता येतील अशी सोय ह्या माणसानं केली आहे. जे जे चांगलं आहे ते ते लोकांपर्यंत पोचलं पाहिजे असा ध्यास घेतलेला हा माणूस आहे. कॉपीलेफ्ट चळवळ किंवा ओपन सोर्स चळवळीचा हा भारतातला फार महत्त्वाचा माणूस आहे.

त्यांच्या वेबसाइटवर जाऊन बघितलंत तर चक्रावून जायला होतं. थोर शिक्षणतज्ञ जे.पी.नाईक यांची जवळजवळ संपूर्ण ग्रंथसंपदा, डी. डी. कोसंबींची पुस्तकं, आयझॅक ॲसिमोव्हची पुस्तकं, अनेक थोर लेखकांची महत्त्वाची पुस्तकं, शिवाय पदार्थविज्ञान, रसायनशास्त्र, अंतराळ, आरोग्य, लैंगिकता, पर्यावरण, गणित, अणु, शेती, समाजशास्त्र, महाराष्ट्रातल्या चळवळी अशा जगण्याच्या सगळया अंगांना स्पर्श करणारी जगभरातली महत्त्वाची पुस्तकं ह्या वेबसाइटवर आहेत. दररोज ५००० पुस्तकं ह्या वेबसाइटवरून डाऊनलोड होतात. काही

लाख लोक रोज ह्या फिल्म्स बघतात. अनुवादित करतात. अरविंदजींच्या खोलीमधे जगभरची माणसं, - पुस्तकं- विचार सतत येतजात असतात. जे जे ऊर्जादायी आहे ते ते त्या खोलीत आपोआप पोचतं.

सगळयात महत्त्वाची गोष्ट. समाजापासून आणि मुलभूत प्रश्नांपासून स्वत: तोडून घेऊन काम करणारे अनेक शास्त्रज्ञ आणि लोक आपल्याला दिसतात. अरविंदजी त्यातले नाहीत. शंकर गुहा नियोगींच्या संघर्षात्मक कामात ते होते. डॉ. अनिल सद्गोपाल, प्रो. यशपाल, प्रो. कृष्णकुमार, लीलाताई पाटील अशा शिक्षण क्षेत्रातल्या महत्त्वाच्या लोकांबरोबर ते काम करत आले आहेत. आपल्या जडणघडणीमधे यदुनाथ थत्त्यांचा आणि राष्ट्र सेवादलाचा मोठा वाटा आहे हे ते आवर्जून सांगतात. आपण हे लक्षात घेऊ की त्यांचं विज्ञानासंदर्भातलं काम ही त्यांची व्यापक राजकीय कृती आहे. त्यामुळं त्यांना आपण त्या संदर्भापासून तोडून बघायला नको. त्यांना आपण विज्ञानाचा जादूगार बनवायला नको. आपण त्यांचं पोस्टर बनवायला नको. आणि आजच्या मॉलसंस्कृतीमधे त्यांची विक्री होऊ नये याचीही आपण काळजी घेऊ.

मंडळी आपल्या सगळयांना सध्या खूप राग येतोय. गर्दीचा, गाडयांचा, धुराचा, स्वत:चा, इतरांचा, दुसऱ्या जातीचा, दुसऱ्या धर्माचा. आपण सारे अस्वस्थ आहोत. चटकन निराश होतो आहोत. अरविंदजी निराश होतात की नाही माहित नाही. त्यांना राग येतो की नाही माहित नाही. पण राग आलाच तर ते एक पुस्तक भाषांतरित करत असावेत किंवा फारच राग आला तर स्वत: पुस्तक लिहित असावेत असं वाटतं, असो. ही थोडी गंमत झाली.

अरविंद गुप्ता हा एक आवेग आहे. जबरदस्त पॅशन आहे. ह्या धबधब्याखाली गेल्यावर तुम्ही कोरडे राहू शकत नाही. तुम्हीही वाहते होता. साचलेपण दूर होतं. त्यांच्या खोलीत जाताना आपण सिनिक असतो, नाराज असतो, निराश असतो, साशंक असतो. बाहेर येताना मात्र आपण लहान मुलासारखे ताजेतवाने होऊन येतो. जगण्यात जे जे सत्य आणि सुंदर आणि मंगल आहे त्याची पूजा करणारा हा माणूस आहे. सध्या काही शब्द फारच बदनाम झालेत, आऊटडेटेड झालेत. सुंदर आणि मंगल हे शब्द ऐकल्यावर एक गट खवळतो. पूजा हा शब्द ऐकल्यावर दुसरा खवळतो. पण हा माणूस चांगल्या फिल्मला 'ये तो प्रशाद है' असं म्हणून हात जोडायला कचरत नाही.



---

लेखक : **समीर शिपूरकर**, अवकाश निर्मिती
९४२२०८९३१०,
sameership007@gmail.com